**श्रीक्षेत्र पंढरपूर येथे वारीसाठी येणाऱ्या वारकऱ्यांसाठी "विठ्ठल रखुमाई वारकरी विमा छत्र योजना" राबविण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५५/विमा प्रशासन,**
मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २१ जून, २०२३

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्राचे आराध्य दैवत श्रीविठ्ठलाच्या पंढरपूर येथील वारीमध्ये दरवर्षी सुमारे १५ ते २० लक्ष वारकरी सहभागी होतात. या वारकऱ्यांचे आजारपण, अपघात व मृत्यू यासाठी विमा छत्र देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

आता शासनाने असा निर्णय घेतला आहे की, पंढरपूर दिंडीत सहभागी होणाऱ्या वारकऱ्यांसाठी "विठ्ठल रखुमाई वारकरी विमा छत्र योजना" या योजनेच्या माध्यमातून विमा छत्र उपलब्ध करुन देण्यात येईल. त्याचे स्वरुप खालीलप्रमाणे असेल :-

(१) दिंडीच्या दरम्यान झालेल्या दुर्घटनेत / अपघातात वारकऱ्याचा मृत्यू झाल्यास प्रत्येकी रु.५,००,०००/- (रुपये पाच लाख फक्त) शासनाकडून वारसास सानुग्रह अनुदान देण्यात येईल.

(२) याव्यतिरिक्त, खाजगी क्षेत्रातील विमा कंपनीच्या सहाय्याने विमा योजना राबविण्यात येईल. तिचे स्वरुप पुढीलप्रमाणे राहील :-

१) दिंडीच्या दरम्यान अपघातात कायमचे अपंगत्व वा विकलांगता आल्यास विमा कंपनीकडून खालीलप्रमाणे प्रतिव्यक्ती विमा रक्कम प्रदान करण्यात येईल :-

(अ) दोन्ही हात, दोन्ही पाय, दोन्ही डोळे, एक हात/पाय व एक डोळा निकामी झाल्यास रु.१,००,०००/-

(ब) एक हात, एक पाय किंवा एक डोळा निकामी झाल्यास रु.५०,०००/-

२) वैद्यकीय उपचारासाठी प्रत्येकी रु.३५,०००/- किंवा प्रत्यक्ष वैद्यकीय खर्च यापैकी जी कमी असेल तेवढी रक्कम विमा कंपनीकडून प्रदान करण्यात येईल.

३) सदर विमा योजनेसंबंधीच्या अटी, शर्ती व अन्य तरतुदी परिशिष्ट-अ मध्ये नमूद करण्यात आल्या आहेत.

४) सदर विमा योजनेबाबत आवश्यकतेनुसार विमा संचालनालयाचा सल्ला घेण्यात येईल.

(३) “विठ्ठल रखुमाई वारकरी विमा छत्र योजना” या योजनेची अंमलबजावणी, संनियंत्रण तसेच विमाहप्ता भरण्याची कार्यवाही शासनाच्या मदत व पुनर्वसन विभागाकडून करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०६२११७४१२९८००५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nitin Kareer

Digitally signed by Nitin Kareer
DN: c=IN, o=Personal, title=4328,
pseudonym=D795C92D3E5175B65918602D1FF7DDA29E7203FF,
2.5.4.20=5837a882a65e40c9b784053fbda69db0b2c49c6d2615c6d7f1f764b780900d63, postalCode=400006, st=Maharashtra,
serialNumber=E98FD22465542FE8803DD3C8EB1B4BD6BCB6A934BFC898079E251491D043D807, cn=Nitin Kareer
Date: 2023.06.21 17:50:03 +05'30'

**( डॉ. नितिन करीर )**
अपर मुख्य सचिव (वित्त), महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.वित्तमंत्री यांचे सचिव / प्रधान सचिव
४) सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक
५) सर्व विधान मंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य,
६) सर्व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य
७) महालेखापाल (लेखा परीक्षा)-१ महाराष्ट्र, मुंबई
८) महालेखापाल (लेखा परीक्षा)-२ महाराष्ट्र, नागपूर
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र, मुंबई
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२ महाराष्ट्र, नागपूर
११) महालेखापाल (लेखा परीक्षा-३), महाराष्ट्र, मुंबई
१२) महालेखापाल, स्थानिक संस्था, लेखापरीक्षा व लेखे, मुंबई
१३) वरिष्ठ महालेखापाल, स्थानिक संस्था (लेखा परीक्षा व लेखे), नागपूर
१४) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१५) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१९) मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव.
२०) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२१) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
२२) जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई
२३) बहुजन समाज पार्टी १, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई - १
२४) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक नं-१ योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरिमन पॉईंट, मुंबई -२०.
२५) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४,राजभवन,एस.व्ही.पटेल रोड, मुंबई -४
२६) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस वरळी, मुंबई-१३
२७) इंडियन नॅशनल कॉंग्रेस, महाराष्ट्र प्रदेश कॉंग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई -२५
२८) राष्ट्रवादी कॉंग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री-प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई-२१.
२९) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चाळ, दादर, मुंबई -२८.
३०) निवड नस्ती, विमा प्रशासन कार्यासन, वित्त विभाग

*पत्राद्वारे.

## परिशिष्ट-अ

## विठ्ठल रखुमाई वारकरी विमा छत्र योजनेतील अपघात विम्यासंबंधी तरतुदी

| | | |
|---|---|---|
| विमा रक्कम | | रु.१,००,०००/- (कंपनीकडून) |
| विमाहप्ता | | रु.१८/- (प्रति १ लाख विमा रकमेकरिता) |
| विमा कालावधी | | ३० दिवस |
| विमा रक्कम | | १,००,००० (CSI) |
| अ.क्र. | अपघाताचे स्वरुप | टक्केवारी |
| १ | अपघातामुळे आलेला मृत्यु | १००% विमा रक्कम (CSI) |
| २. | अपघातात दोन हात, दोन पाय, दोन डोळे , एक हात/पाय व एक डोळा | १००% विमा रक्कम (CSI) |
| ३ | एक हात, एक पाय, एक डोळा | ५०% विमा रक्कम (CSI) |
| ४ | कायमचे अपंगत्व/विकलांगता | १००% विमा रक्कम (CSI) |
| वैद्यकीय उपचाराचा खर्च | | प्रत्यक्ष खर्च किंवा ३५,०००/- यापैकी जे कमी असेल ते |

१) समूह विमा योजनांच्या प्रचलित नियमानुसार सदर योजना कार्यान्वित करणेसाठी सदरील समूहाचे स्तरावर प्रबंधन करणेसाठी आवश्यक ती यंत्रणा / समिती स्थापन करण्यात येईल.

२) सदरील योजनेकरिता संबंधित विमा कंपनीकडून नाव नसलेले (Unnamed Policy) विमा पत्रक निर्गमित करण्यात येणार असून त्याकरिता वारकरी हा गट विनिर्दिष्ट करण्यात येत आहे.

३) ज्यादिवशी विमाहप्ता भरण्यात येईल त्याच्या पुढील तारखेपासून तीस दिवसांपर्यंत त्याची मुदत राहील.

४) एखादी व्यक्ती सदर कालावधीत मरण पावल्यास ती वारकरी समुदायातील आहे किंवा कसे याची पडताळणी करण्याकरिता सक्षम प्राधिकाऱ्याकडून जिल्हाधिकारी कार्यालाकडून तसे प्रमाणित करण्यात येईल..

५) सदर विमापत्रकामध्ये समाविष्ट वारकऱ्याची संख्या समाविष्ट करण्यात येईल.

६) सदर विमापत्रकात खालील कारणांकरिता लाभ देय होणार नाही.

I) आत्महत्या वा तसा प्रयत्न

II) अमली अथवा मादक पदार्थांच्या अंमलाखाली मृत्यू

III) प्रसुती अथवा बाळंतपणादरम्यान मृत्यू किंवा विकलांगता आल्यास

IV) गुन्हेगारी उद्देशाने कोणात्याही कायदयाचे उल्लंघन केल्यामुळे आलेला मृत्यू किंवा विकलांगता

V) गुप्त रोग अथवा वेडसरपणा यामुळे आलेला मृत्यू किंवा विकलांगता

VI) किरणोत्सर्ग,अणुभटटया, युध्द व बंड इत्यादी तत्सम कारणांमुळे उद्भवलेला मृत्यू किंवा विकलांगता.

७) विमा पत्राअंतर्गत वैद्यकीय उपचाराकरिता झालेला प्रत्यक्ष खर्च अथवा जास्तीत जास्त रु.३५,०००/- विमारक्कम देय राहील.

----------------